**नागपूर येथील हिवाळी अधिवेशन कालावधीत मा. मंत्री /राज्यमंत्री, अधिकारी /कर्मचारी यांना निवासस्थान /कार्यालयीन सुविधा पुरविण्यासाठी गठीत "नागपूर निवास व्यवस्था समितीची" पुनर्रचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक विमंअ-३२१९/प्र.क्र.८६/कार्यासन-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०९ डिसेंबर, २०१९.

<u>वाचा</u>:- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक विमंअ-३२१४/प्र.क्र. ७५ /सात, दि.११ नोव्हेंबर,२०१४.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक विमंअ ३२१४/प्र.क्र.७५/सात, दिनांक ११ नोव्हेंबर, २०१४ अन्वये नागपूर येथील हिवाळी अधिवेशन कालावधीत मा. मंत्री, राज्यमंत्री, अधिकारी, कर्मचारी यांना निवासस्थान/कार्यालयीन सुविधा पुरविण्यासाठी **" <u>नागपूर निवास व्यवस्था समिती</u>"** गठीत करण्यात आली होती. सद्यस्थितीत विधानसभेच्या सन २०१९ च्या निवडणुकीनंतर राज्यात नवीन मंत्रीमंडळ गठित करण्यात आल्यामुळे उपरोक्त समितीची नव्याने पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव मा. मुख्यमंत्री महोदयांना सादर करण्यात आला होता. सदर नस्तीवर मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या निर्देशानुसार सन २०१९ च्या हिवाळी अधिवेशनाच्या व्यवस्थेसंदर्भात खालील मा. मंत्री महोदय हे पुढील आदेश होईपर्यंत काम पाहतील:-

१) मा. श्री. एकनाथ शिंदे, मंत्री,
२) मा.श्री. बाळासाहेब थोरात, मंत्री,

२. नागपूर निवास व्यवस्था व इतर अनुषंगिक बाबीसंदर्भात विभागीय आयुक्त, नागपूर यांनी नागपूर येथे दिनांक १६ डिसेंबर, २०१९ रोजी सुरु होत असलेल्या हिवाळी अधिवेशनाच्या पार्श्वभूमीवर मा.मंत्री / अधिकारी/कर्मचारी यांची निवास व्यवस्था व कार्यालयीन सुविधेच्या अनुषंगाने उपरोक्त नमूद मा. मंत्रीमहोदयांचे निदेश प्राप्त करुन त्यांच्या निदेशानुसार पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२०९१८०८५४६००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anshu Sinha

Digitally signed by Anshu Sinha
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a3a7504068b24f4e7eb0277456c1fe4e5d31e4d0b0fdc81eb8816e33c5735b5b, serialNumber=e71208cc885f6d3c01b374ed0921df256abda4ed94d69472deb566c39b4ee68c, cn=Anshu Sinha
Date: 2019.12.09 18:11:29 +05'30'

**( अन्शु सिन्हा )**
**सचिव ( प्र.सु. व र.व का. )**

**प्रति,**

१. मा. श्री. एकनाथ शिंदे, मंत्री, महाराष्ट्र शासन.
२. मा.श्री. बाळासाहेब थोरात, मंत्री, महाराष्ट्र शासन.

३. सर्व मा.मंत्री, महाराष्ट्र शासन
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ४०० ०३२.
९. सचिव ( प्र.सु. व र. व का. ),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. सचिव ( व्यय ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग , नागपूर
१२. जिल्हाधिकारी, नागपूर, नागपूर
१३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक १, नागपूर
१५. निवडनस्ती (कार्यासन ७ )

*************